**वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा व त्यांतंर्गतच्या उपविभाग, शाखा कार्यालयांचे नियंत्रण अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर या मंडळ कार्यालयाकडे वर्ग करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग, मंत्रालय**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१६/VIP-५२/प्र.क्र.१६१/२०१६/आ.(प्रशि.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ मार्च, २०१७.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. आढावा-१००२/३३५/२००२/आ.(प्रशि.), दि.६/२/२००३.

प्रस्तावना -

वर्धा जिल्ह्यातील सिंचन व्यवस्थापन कामासाठी वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा हे विभागीय कार्यालय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर या प्रादेशिक कार्यालयाधिनस्त कार्यरत अधीक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर यांचे नियंत्रणाखाली कार्यरत आहे. या विभागांतर्गत सेलू, आर्वी, हिंगणघाट आणि पिंपरी येथे ४ उपविभागीय व ११ सिंचन शाखा कार्यालये कार्यरत असून, विभागीय कार्यालयांतर्गत १-मोठा, ४-मध्यम व २०-लघु प्रकल्पांतर्गतची सिंचन व्यवस्थापनाची कामे हाताळली जात आहेत. त्यामुळे विभागाकडे प्रकल्पांतर्गतची एकूण निर्मित सिंचन क्षमता ४१,३९० हेक्टर इतकी आहे. त्यापैकी सन २००४-२००५ मध्ये ५,७८० हेक्टर इतके क्षेत्र प्रत्यक्ष सिंचनाखाली आले आहे. सिंचन लाभक्षेत्रात टप्प्या टप्प्याने वाढ होऊन, सन २०१५-२०१६ पर्यंत जवळपास २९,४३६ हेक्टर इतके क्षेत्र सिंचन लाभक्षेत्राखाली आले आहे.

सन २००४ ते २०१६ या बारा वर्षाच्या कालावधीत वर्धा जिल्ह्यात सिंचनाखाली आलेल्या लाभक्षेत्राचा विचार करता, जवळपास ६०% इतक्या सिंचन लाभक्षेत्रात वाढ झालेली आहे. या सिंचन कार्यप्रकारातील विभागीय कार्यालयाचे सध्याचे मंडळीय नियंत्रण बांधकाम कार्यप्रकारातील मंडळ कार्यालयांतर्गत आहे. यास्तव भौगोलिक संरचनेनुसार व मंडळीय नियंत्रण तसेच सिंचन व्यवस्थापन कामात सुसूत्रता ठेवणे, त्याचबरोबर लाभधारक शेतकऱ्यांना समन्यायी पाण्याचे वाटप करणे या दृष्टीने कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्या शिफारशीनुसार वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा हे विभागीय कार्यालय अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर या सिंचन व्यवस्थापन मंडळ कार्यालयांतर्गत संलग्न करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा या सिंचन कार्यप्रकारातील विभागीय कार्यालयाच्या मंडळीय नियंत्रणात बदल करुन, सदरहू विभागीय कार्यालय अंतर्गतच्या उपविभाग व शाखा कार्यालयांसह (मंजूर

आस्थापना व अस्तित्वातील कार्यभारासह) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर यांच्या नियंत्रणाखाली कार्यान्वित करण्यास यान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर - ६११/८३/ एडीएम-९, दि. ०८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा या विभागीय कार्यालयाचे कार्यकारी अभियंता यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर या मंडळ कार्यालयाचे अधीक्षक अभियंता यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

३. या प्रकरणी होणारा खर्च "२७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे, ००१ संचालन व प्रशासन, (०४) व्यवस्थापन आस्थापना, (०४) (०४) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर (२७०१ १७१६) या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागवावा.

४. वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा हे विभागीय कार्यालय अंतर्गतच्या उपविभाग व शाखा कार्यालयांसह दि.०२.०५.२०१७ पासून कार्यान्वित होईल याद्दष्टीने कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी. तसेच दिनांक ३०.०४.२०१७ पर्यंत विभागीय व अंतर्गतच्या उपविभाग, शाखा कार्यालयातील मंजूर आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन सध्याच्या कार्यपध्दतीनुसार चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर यांचे कार्यालयाकडून अदा करण्यात यावे.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दिनांक १५.१०.१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्रधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०३१७१६०८०५३४२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sangeeta M Kholgadge

Digitally signed by Sangeeta M Kholgadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24b378b1cb0f3c9d70d93261e45c83a11f0c2bbeb199c1858522d36476761396, cn=Sangeeta M Kholgadge
Date: 2017.03.17 16:10:00 +05'30'

**( सं. म. खोलगाडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव.
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.

६. मा.विधानपरिषद/ विधानसभा सदस्य (सर्व).
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे उपसचिव.
८. प्रधान सचिव (जसंप्र व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१२. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य, (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
१३. संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. सर्व महासंचालक / सर्व कार्यकारी संचालक, महामंडळ कार्यालये, जलसंपदा विभाग.
१५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, जलसंपदा विभाग, नागपूर.
१६. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. मुख्य अभियंता (जलसंपदा), जलसंपदा विभाग, नागपूर
१९. आंतर वित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. उपसचिव (प्रशासन) / (आस्थापना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. सर्व मुख्य अभियंता / सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. अधीक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर.
२३. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर.
२४. अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
यांना विभागीय व उपविभागीय कार्यालयांच्या मंडळीय नियंत्रणात झालेल्या बदलाबाबतची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव.
२६. कार्यकारी अभियंता, वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा.
२७. सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ/ निवडनस्ती.

*******